लोकमान्य !

हें तुमचें तुम्हांला –

– गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर

# प्रास्ताविक

लोकमान्यांच्या जन्मशताब्दी-महोत्सवाच्या निमित्ताने त्यांच्या जीवनावर आधारलेली अेखादी अेकांकिका लिहावी, असें मान्यवर जयंतराव टिळकांनी सुचविलें. वेळ अतिशय थोडा होता. तेवढ्या अल्प अवधींत श्री. तात्यासाहेब केळकरांनी लिहिलेलें टिळक-चरित्र व श्री. बापटांनी अेकत्रित केलेल्या आठवणींचे तीन खंड वाचून काढले.

आठवणींतील अेका स्मृतिशलाकेवर ही अेकांकिका आधारलेली आहे. लोकमान्यांव्यतिरिक्त अितर सर्व पात्रें काल्पित आहेत.

अेकांकिका छापण्याच्या कामीं श्री. जयंतराव टिळक यांनी जे साहाय्य केलें, त्याबद्दल त्यांचे अुपकार मानणें आवश्यक आहे. सह्याद्रीचे कार्यकारी संपादक श्री. ल. ना. गोखले, यांनी हें आपलेंच काम समजून अेकांकिकेच्या छपाअीकडे जातीने लक्ष पुरविलें हेंहि नमूद करणें आवश्यक आहे.

ही अेकांकिका श्री. मामा पेंडसे यांनी श्रमपूर्वक बसविली, आणि कुर्ला येथील राजहंस कलाविकास मंडळाच्या वतीने दि. २८–७–५६ रोजीं लोकमान्य जन्मशताब्दी-महोत्सवांत पुणें येथे शिवाजी-मंदिरांत तिचा प्रयोग केला.

गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर,
तळेगाव-दाभाडें,
जि. पुणें.

प्रथम प्रयोगांतील पात्रांची
ओळख –

**संध्या** – श्री. बडगुजर.
**बाअीसाहेब** – सौ. शीला मराठे
**रावसाहेब** – श्री. चिंतामणी पेंडसे
**शास्त्रीबुवा** – श्री. आचरेकर
**भास्करराव** – श्री. मराठे
**वामनराव** – श्री. धामणकर
**लोकमान्य** – श्री. साठे
**रंगभूषा-वेषभूषा** – श्री. बाबा वर्दम

# कुऱ्हाडीचा दांडा

## प्रवेश पहिला

[ सतरंजी, तीवर गादी, अुशी, पांघरायची चादर असें छानदार अंथरूण बैजवार अुलगडीत असतां संभ्याची धांदल. अंथरूण त्याच्या धन्याचें – रावसाहेबांचें आहे. अंथरूण नीट साफस्वच्छ करीत असतां आपल्याशींच संभ्या बोलत आहे. ]

**संभ्या** – म्हंजी अिक्की वर्सं झाली का मला रावसाबांचं हांतरून अुलगडतां अन् गुंडऽतां – पर काय खरं न्हाअी! जरा कुटं सुरकाती न्हायली का, त म्हंगऽत्यांत, संभ्या, तूं गाडाव हायेस! बरं बाबा! मपला मी गाडाव तर गाडाव! पर मी गाडाव झालों का, म्हंजी रावसाब कोन झालं? आं? कोन झालं? कुंबार न्हाअी तर परीट – ( जीभ चावीत ) अगा बाबौ! संभ्या तूं बी पक्का गाडाव हायेस! रावसबा परतायची याळ झाली, आन् टिळक म्हाराजा-परमानं – सबांतून याख्यान सांगितल्या-वानी बडबडत बसलास! आता बडबड बंद! ( पुनः अंथरुणावरील सुर-कुत्या साफ करतो. पण त्याचा तोंडाळ स्वभाव त्याला स्वस्थ बसूं देत नाही. ) न्हव, पर आपल्याला काय ह्ये अुगमना झालं! टिळक म्हाराज अिक्का ग्येव मानूस! पंर त्याला ज्या मोजल्याबिगर रावसाबाला पान्याचा घोट काअी गिळऽना झालाय्! म्हंजी न्हाअी ज्या घिल्या का, न ठसका लागऽतो! ( कोणी तरी आल्याची चाहूल लागते. जीभ बाहेर काढून संभ्याः तोंड बंद करतो. जणूं आपण त्या गावचे नाही, अशा रीतीने पुनः अंथरूण साफ करूं लागतो. त्याचाच पाय लागून गादीचा अेक कोपरा अुसकटतो. तो नीट करीत असतां संभ्याला खोकला येतो. पुनः बडबड सुरू होते. ) तिच्या बायलीला! ह्यो ठसका अुसळला का, म्हंजी पान्याच्या

ढवांत बुडिवल्यावानी हुतंय्! बाईसाहेब ग्येल्या हायेत खुन्या मुर्लीधरांत कीर्तनाला. त्या काय इक्त्यांत येनार न्हाईत. तवा येकदा या ठसक्याला चिलमीचा हिसका दावल्याबिगार काय भागायचं न्हाय्. (खिशांतून चिलीम काढून तिच्यांत तंबाकू भरीत असतां पुढील वटवट चालते.) पर ह्या पुन्यांतल्या द्येवांचंबी पुरान आपल्या काई कळऽना झालं! कुटं कुनी खुन्या मुर्लीधर, तर कुंनी सोट्या म्हसूबा! अगा बाबौ! सोट्या म्हसूबाचं नांव घ्येता बरुबर पाठकाडांत दनाक्‌दिशीं सोट्या मारल्यावानी हुतंय! कुनी झिलब्या मारुती, तर कुनी चिमन्या गणपती! कुटं म्हन छिनाल बालाजी – (एकदम जीभ चावून) छा छा! इट्ठला पांडुरंगा, तुला छिनाल म्हननन्याचा आप्राद क्येल्याबद्दल मापी द्ये बरं का! पुन्ना न्हाअी असलं वंगाळ बोलायचा – न्हवऽ! पर हीं असलीं कसलीं नांवं? आं? असलीं कसलीं? (अितक्यांत बाअीसाहेब हातांत चांदीचा पेला, त्यांत कुंकवाचें पंचपाळें, अंगावर शाल पांघरलेला, नाकांत नथ – अशा येतात. त्यांना पहातां बरोबर संभ्या चिलीम लपवूं जातो. तंबाखू अंथरुणावर सांडते. ती गोळा करूं जातो, तों हातांतली चिलीम, छापी हे सगळें साहित्य अुघडकीस येते, खाली पडतें.)

**बाअीसाहेब** – (तिथेच थांबून) संभ्या! मेल्या हज़ारदा तुला सांगितलं, तें धुराचं नळकांडं घेअून हितं येत जाअूं नकोस म्हणून! मी सांगितलं, हिकडून सांगायचं झालं! तरी तुझी खोड कशी ती जात नाही –

**संभ्या** – न्हाअी बाअीसाब!

**बाअीसाहेब** – आणि वर शिवाय प्रपादतो आहेस? आं?

**संभ्या** – व्हय् बाअीसाब!

**बाअीसाहेब** – कर्म्या! होय काय नि नाही काय! हित मोठीं माणसं यायचीं! रावसाहेब, भाअूसाहेब, हुजूर कारकून, झालंच तर रजिष्टर-सुद्धा यायचे! अेकदा गोरा जडजूसुद्धा आल्ता! अन् मेल्या तुझा हा असला धांदरटपणा कसा रे! हिकडे मीं हज़ारदा सांगितलं! महिन्यांतून बारा-पंधरा दिवस साहेबांबरोबर फिरतीला जावं लागतं, तर अेखादा कुणी आपलाच ब्राह्मण गडी ठेवावा! सैंपाकहि करीत जाअील, – झालंच तर – हा अितर जातीचा नको –

**संभ्या** – ( मोठ्या विनयाने ) न्हाअी बाअीसाब – मीबी सैपाक करीतो –

**बाअीसाहेब** – हो का ! मेल्यांनो ! कुणाचा ? हिकडचा का ?

**संभ्या** – न्हाअी-मपला माजा-झुनका-भाकरी येकांद्या बारीला भातबी करीतों –

**बाअीसाहेब** – पुरे झालं रे तु ं ! मी अिकडच्या सैपाकाचं म्हणलें ! तुझा काय अुपेग ? पाणी सुद्धा चालायचं नाही देवपूजेला तुझ्या हातचं –

**संभ्या** – ( चाचरत ) न्हव पर –

**बाअीसाहेब** – आता कसलं आलंय् पर ? बोल की !

**संभ्या** – न्हाअी म्हंजी – वाट ऽ नं लअी तान लागली का, म्हंजी माज्या तांब्यांतलं पानी पित्यात रावसाब –

**बाअीसाहेब** – ( चकित होअून ) हा मेल्यांनो ! सांगताएस काय ?

**संभ्या** – ( जीभ चावीत ) पर मला म्हंग त्यात, घरांत सांगू नगोस! आता तुमी दापून अिच्यारलं म्हनूनच मपल्या तोंडांतून भायेर पडलं.

**बाअीसाहेब** – जेवीतबिवीत नाहीत ना कधी तुझ्या हातचं ?

**संभ्या** – औशीद प्येलऽ नस्लऽ का, म्हंजी मग न्हाअी जेवीत –

**बाअीसाहेब** – औशीद ?

**संभ्या** – म्हंजी – म्हंजी – ( हाताने खूण करतो ).

**बाअीसाहेब** – ( तिटकाऱ्याने ) जळ्लं लक्षण तें ! कुठला मेला छंद लागलाय् – काय रे, तें मातीमसणं प्याल्यावर मग काय करतात ?

**संभ्या** – ( सावरून घेत ) न्हाअी – म्हंजी ह्येच आपलं – द्येवदर्शन करीत्यात !

**बाअीसाहेब** – देवीचं दर्शन करीत असतील ! काय रे, कुणा बाअीला तंबूत बोलावलं होतं का कधी ?

**संभ्या** – न्हाअी म्हंजी सायेब निसतं गानं अैकीत्यात बरं का ! बाया लअी छान गात्यात – द्येवाचं – कुटं आबांग – कुटं गवळनी –

**बाअीसाहेब** – ( अुसासा सोडीत ) नको ग बाअी हा बायकांचा जन्म ! ( नमस्कार करून ) मुरलीधरा, तुलाच रे बाबा गाऱ्हाण ! ( संभ्याकडे वळून ) आणखी काय काय करतात रे संभ्या ?

**संभ्या** – छा छा ! काअीबी न्हाअी ! काअीबी न्हाअी !

**बाअीसाहेब** – नाही कसं ! तूंच तर सांगत होतास – तुझ्या हातचं जेवतात म्हणून !

**संभ्या** – ( गडबडून ) न्हाअी म्हंजी – जेवीत न्हाअीत खरं – आपलं काय-बाय क्येलं आसल्, त्यें तिक्त मातर पानांत वाडायला सांगऽत्यात – पर दुरून बरं का !

**बाअीसाहेब** – काअीबाअी म्हंजे ?

**संभ्या** – म्हंजी आपलं ह्ये – कोंबडं कापलं आसल् – ससा मारला आसल् – ( बाहेरून बोलणें ऐकूं येतें – " तर शास्त्रीबुवा, आपलं ठरलेलं आहे – धर्ममार्ग सोडायचा नाही " – संभ्या घाबरतो ) आलऽ बरं का बाअीसाब ! रावसाब आलऽ ! पर –

**बाअीसाहेब** – ( आंत जात ) काय पर –

**संभ्या** – न्हव – मीं सांगितलं म्हनून रावसाबाला सांगू नका – ( बाअी आंत जातात. संभ्या गरीब मुद्रा करून पुढे जातो. पुणेरी पगडी, लांब काळा कोट, वर भरजरी अुपरणें, चांदीच्या मुठीची काठी, पुणेरी लालचुटुक जोडा, अशा थाटांत रावसाहेब येतात. त्यांच्याबरोबर कंमी किंमतीची पुणेरी पगडी, बाराबंदी, असा वेष असलेले पन्नाशींतले शास्त्रीबुवा लाचार हंसू हंसत येतात. संभ्या घाअीघाअीने रावसाहेबांना कोट काढायला मदत करतो. नंतर कोट, पगडी, अुपरणें, काठी – घेअून तो आत जाअूं लागतो. )

**रावसाहेब** – संभ्या, तुझ्या मालकीणबाअी आल्या का रे ?

**संभ्या** – व्हय्, आल्यात् –.

**रावसाहेब** – आज आमची चतुर्थी आहे –

**शास्त्रीबुवा** – म्हणजे संकष्टी ?

**रावसाहेब** – होय – तर आज नैवेद्याला मोदक करावयाचे – लक्षांत आहे ना म्हणावं ?

**संभ्या** – व्हय् –( आंत जातो. )

**शास्त्रीबुवा** – धन्य आहांत रावसाहेब आपण! अेवढा अधिकार,

अेवढं वैभव असून पुनः सगळी व्रतं निष्ठेनं पाळतां ! अगदी थेट – बाजीराव पेशव्यांची आठवण होते –

**रावसाहेब** – (अुपेक्षेनं हसून ) ती कशी काय ?

**शास्त्रीबुवा** – नाही म्हणजे हेंच – अहो अेवढी आंग्रेजांची फौज मागं धावत असलेली – पण पळतां पळतां जिथं मुक्काम झाला, तिथं नैमित्तिक यथासांग अुरकली – म्हणजे आपलं गोदानं, सहस्रभोजन ! अहो अिकडे तोफेचे गोळे अगदी थेट गोटापर्यंत येअून पडायचे ! पण अेकदा ब्राह्मण-भोजनाचा संकल्प सोडला म्हणजे सोडला ! त्यांच यथासांग भोजन अुरकल्या-शिवाय स्वारी पुढं हलायची नाही ! जेवण यथास्थित – डावं, अुजवं, पांच खिरी, सात कोशिंबिरी, कापूर लावलेलं पिण्याचं पाणी, भरपूर दक्षिणा, वर गोविंदविडे –

**रावसाहेब** – तुम्हांला काय माहीत ?

**शास्त्रीबुवा** – अहो म्हणजे मी होतो ना ! अेका पंक्तीला मीहि होतो ! अर्थात लहान होतो, आअीच्या कुशीत जेवायला बसलो होतो. इकडे खासे बाजीरावसाहेब लाडवांच्या गोळयांचा आग्रह करीत होते; अन् अिकडे कनातीवर बंदुकांच्या गोळया येअून पडत होत्या ! मोठा तेजस्वी माणूस बरं का ! अहो देवाचा अवतारच तो !

**रावसाहेब** – त्याच्या धाकानं बायांनी विहिरीत अुड्या टाकून जीव दिले म्हणे –

**शास्त्रीबुवा** – छा छा छा ! अंहो खरं नाही ते ! अन् समजा असलंहि खरं, तरी काय झालं ! थोरल्या बाजीरावांनी नाही अेक यवनी घरांत आणली ? त्याच्यापेक्षा हे बरं !

**रावसाहेब** – ( तुच्छतेने ) शास्त्रीबुवा, मूर्ख अहांत झालं तुम्ही !

**शास्त्रीबुवा** – ( दचकून ) मूर्ख ?

**रावसाहेब** – अेक क्षुद्र निरुपयोगी माणूस तो ! तेज होतं म्हणे त्याच्या थोबाडावर ! अगदी पाघळत होतें ! तुमच्या अकलेचे दिवे पाजळले होते, त्यांच असेल ! पण मी म्हणतों तुमचाहि काय अुपयोग आहे हो जगाला ?

**शास्त्रीबुवा** – ( केविलवाणेपणें ) रावसाहेब, म्हातारा ब्राह्मण आहे – घरीं चार लेकरबाळं आहेत –

**रावसाहेब** – तुम्हांला अेकट्याला नाही म्हणत आम्ही! अेकूण सगळ्या भटाभिक्षुकांचं बोलतोय् !

**शास्त्रीबुवा** – ( थोडा धीर येअून ) असंअसं ! मला वाटलं – पण भारीच हो अलीकडे भिक्षुकांचंहि बंड माजलंय् –

**रावसाहेब** – ( त्याच्याकडे लक्ष न देतां ) शतचंडी कसली, अन सहस्रचंडी कसली ! पावसाळ्यांतल्या बेडकांसारखं तास न् तास आरडत बसायचं, दुपारीं भरगच्च जेवायचं, अन् मग झोपा काढायच्या पांच पांच वाजेस्तवर ! संध्याकाळीं अुठून अड्ड्यावर बसून दुसऱ्या आमंत्रणाची वाट पाहायची – अुद्योग हवा म्हणून याच्या टवाळ्या कर, त्याच्या टवाळ्या कर !

**शास्त्रीबुवा** – अहाहा ! काय सूक्ष्म निरीक्षण आहे ! काय अपार बुद्धिवैभव आहे ! बृहस्पतीच जणूं कांही ! रावसाहेब, आपण ग्रंथ का लिहीत नाही अेखादा ! यावच्चंद्रदिवाकरौ कीर्ति राहील –

**रावसाहेब** – कसला ग्रंथ ?

**शास्त्रीबुवा** – नाही म्हंजे अेखाद्या ग्रंथावर टीका-निर्णयसिन्धु – धर्मसिंधु –

**रावसाहेब** – विद्वान् अहांत झालं ! अुद्या तुम्ही मला शनिमहात्म्यावर दीपिका नाही तर वपनमीमांसेवर भाष्य लिहायला सांगाल !

**शास्त्रीबुवा** – छे छे ! असलं भलतं कसं सांगेन ? पण रावसाहेब, या संमति-वयाच्या वादासंबंधीं आपण परवा बोलत होतात –

**रावसाहेब** – अहो आमचा गोपाळराव बरोब्बर बोलतो आहे !

**शास्त्रीबुवा** – गोपाळराव ?

**रावसाहेब** – म्हणजे आगरकर ! अेवढंहि लक्षांत येत नाही ना तुमच्या ?

**शास्त्रीबुवा** – नाही – आलं लक्षांत –

**राव** – हा अन् आम्ही – अेका कॉलेजमध्ये होतों – नाही, तसा पांच-सात वर्षं सीनियर होता हा आम्हांला !

**शास्त्रीबुवा** – म्हणजे मग बाळ गंगाधर –

**रावसाहेब** – हां – टिळकचा ना ? तोहि आमच्याच कॉलेजांत होता – चालायचंच ! अेकाच आव्यांत भाजलेलीं मडकीं – अेक जातं

स्वयंपाकासाठी – अन् दुसरं अन्त्येष्टीसाठी ! अेकाच कॉलेजचे विद्यार्थी म्हणून काय झालं ! आमचं पाहा बरं ! पास झालों – वरचा वर्ग मिळाला ! नाही, म्हणजे तशी थोडीशी देशभक्ति आमच्यांतहि जागी होतीच – कॉलेजांत असतांना आम्हीहि बेनसाहेबांना सरळ सांगितलं होतं – अुभं राहून भर वर्गांत !

**शास्त्रीबुवा** – काय ?

**रावसाहेब** – की बाळंतपणाला प्रसूति हाहि अेक पर्यायवाची शब्द आहे ! भर वर्गात साहेबाच्या डोळयाला डोळा भिडवून सांगितलं !

**शास्त्रीबुवा** – धन्य धन्य ! केवढं साहस ! छे ! विरळाच आढळायचं असं ! नाही पण वाद कसला चालला होता ?

**रावसाहेब** – वाद ? अहो अटीतटीला पेटलं होतं प्रकरण ! साहेबांना वाटे, आपल्यालाच मराठी फार कळतं ! मॅटर्निटी होमचा अर्थ काय असा प्रश्न होता. साहेब म्हणाले, बाळंतपण निवास – किंवा सदनहि म्हणावं ! तर आम्ही म्हणालों – मनांत – अरे, तूं आम्हांला शिकवतोस !

**शास्त्रीबुवा** – अैशा भले ! शाब्बास ! मग ?

**रावसाहेब** – मग काय ! साहेबांनी क्षमा मागितली !

**शास्त्रीबुवा** – मागितली ना ?

**रावसाहेब** – म्हणाले, अेक्स्क्यूज मी !

**शास्त्रीबुवा** – घ्या ! म्हणजे तेवढी धर्मबुद्धि असते साहेबांत !

**रावसाहेब** – असते तर ! अुगीच का ते राज्य करताहेत ?

**शास्त्रीबुवा** – आपण पास झाल्यावरचं सांगत होतात –

**रावसाहेब** – हो तर आमचे तीर्थरूपहि शिरस्तेदारच होते –

**शास्त्रीबुवा** – म्हणजे शिरस्तेदारी वंशपरंपरेनं चालत आली आहे आपल्या कुळांत !

**रावसाहेब** – ( लक्ष न देतां ) हडसनसाहेब होता त्या वेळीं सेशन्स जज्ज. तीर्थरूपांना हाक मारून म्हणाला तो, अरे शिवराम, तुझा मुलगा पास झाला म्हणे अिंटर ?

**शास्त्रीबुवा** – म्हणजे अेकवचनीच हांक मारलीन् ?

**रावसाहेब** – त्यांच्यांत तशीच पद्धत आहे –

**शास्त्रीबुवा** – अरे वा !

**रावसाहेब** – काय झालं ?

**शास्त्रीबुवा** – नाही – आपणहि देवाला एक वचनीच हाक मारतो की ! रामा ! कृष्णा ! शंकरा – त्यांतलंच !

**रावसाहेब** – तर हडसनसाहेबानं लगेच चिटकवून घेतल – होता होता शिरस्तेदार झालों आहोंत ! सरळ मार्गानं प्रपंच चालला आहेच की नाही आमचा ? अतिथि आहे – अभ्यागत आहे – तुमच्यासारखी चार माणसं घरीं येतात – खर्च चालला आहे सहस्रमुखांनी. कुणीकडून येतं – कुणीकडे जातं, कांही कळत नाही !

**शास्त्रीबुवा** – प्रत्यक्ष भगवंत योगक्षेम चालवतोय बरं आपला ! तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेम वहाम्यहम् –

**रावसाहेब** – चाललच आहे – माझा स्वभाव आपला असा आहे ! परनिंदा करायची नाही. नाकासमोर चालायच. अहो, पेन्शन घेतल्यावर मग आहेच की देशकार्य ! देश काय कुठं पळून जातोय् की काय !

**शास्त्रीबुवा** – छा छा !

**रावसाहेब** – नाही तर त्या बाळ गंगाधराचं पाहा ! अहो काय भयंकर माणूस आहे !

**शास्त्रीबुवा** – फारच भयंकर !

**रावसाहेब** – ( आवाज बारीक करून ) अहो तुम्हांला सांगतो शास्त्रीबुवा, परवा हजबंडसाहेब काय म्हणाले माहीत आहे ?

**शास्त्रीबुवा** – कांही तरी विशेषच म्हणाले असतील !

**रावसाहेब** – म्हणाले की टिलक अिज़् अे व्हेरी डेंजरस मॅन् ! मस्ट बी हँग्ड !

**शास्त्रीबुवा** – म्हणजे अिंग्रजींत म्हणाले –

**रावसाहेब** – तुम्ही तरी असे अहांत शास्त्रीबुवा ! साहेब अिंग्रजीत नाही तर काय पुश्तूंत बोलेल ?

**शास्त्रीबुवा** – आलं लक्षांत –

**रावसाहेब** – कां म्हणाले साहेब ? माहीत आहे का !

**शास्त्रीबुवा** – आपल्याला सगळंच माहीत असेल म्हणा! अगदी बित्तंबातम्या –

**रावसाहेब** – म्हणजे काय! रात्री ब्रांडी पीत असतां साहेब मला म्हणाला – माझ्या पेल्याला पेला लावून –

**शास्त्रीबुवा** – ब्रांडी म्हणजे –

**रावसाहेब** – औषध असतं – कुमारी-आसवासारखं –

**शास्त्रीबुवा** – हां हां! म्हणजे अपेय नव्हे –

**रावसाहेब** – तर साहेब मला म्हणाला, – मराठींतच सांगतों, अिंग्लंडमध्ये असा माणूस जन्माला येता, तर गोळी घालून ठारच मारला असता!

**शास्त्रीबुवा** – बापरे!

**रावसाहेब** – तर काय! अहो, काय हा माणूस आहे! काय वाटेल ते बोलतो अन् लिहितो आहे! साहेबांची झोप नाहीशी झाली!

**शास्त्रीबुवा** – होणारच! अलीकडे मलाहि झोप येत नाही! ढेकूण फार ना! त्यांत म्हातारपणी –

**रावसाहेब** – डोबल तुमचं! तुम्हांला कांही म्हणतां कांही कळत नाही शास्त्रीबुवा!

**शास्त्रीबुवा** – होतं खरं असं कधी कधी! तर टिळकांच्याविषयी आणखी काय म्हणत होते साहेब?

**रावसाहेब** – फार म्हणत होते! अेकच का कांही आहे? तें कोल्हापूर प्रकरण – ( बाहेरून हांक येते – अदबीची – " रावसाहेब आहेत का घरांत?" ) कोण आहे? ( पुनः तीच हांक ) संभ्या, अे संभ्या!

**संभ्या** – ( धावत येअून ) आलों –

**रावसाहेब** – अरे बाहेर कोण आहे बघ!

**संभ्या** – व्हय् –

**रावसाहेब** – ( चिडून ) संभ्या!

**संभ्या** – जी!

**रावसाहेब** – शुंभा, तुला हजारदा सांगितलं! साहेबांचा अर्दली जसा वागतो, तसं वागत जा!

**संभ्या** – ( बावरून ) व्हय् –

**रावसाहेब** – शंखा ! मग प्रत्येक वेळेला व्हय् काय अन् नाय्  काय !

**संभ्या** – नाय् –

**रावसाहेब** – हुरडाफुंक्या कुठला ! ( शास्त्री-बुवाकडे वळून ) परवा याला ड्रेस घालून कलेक्टर-साहेबांच्या बंगल्यावर नेलं, तर तिथं आपला धनगरासारखा मांडा ठोकून हातांत फुकणी धरून बसला !

**शास्त्रीबुवा** – फुंकणी ?

**रावसाहेब** – अहो ती चिलीम ! रानटी कुठला !

( पुनः बाहेरून हाक येते, " रावसाहेब आहेत काय घरांत ? " ) जा बाहेर पाहून ये ! अन् हें बघ, अगोदर नीट चौकशी कर. नाही तर घेऊन येशील थेट देवघरापर्यंत !

**संभ्या** – नाय् – ( बाहेर जातो. )

**शास्त्रीबुवा** – रावसाहेब, आपल्याकडे हजार प्रकारचीं माणस येत असतील !

**रावसाहेब** – अहो कांही विचारूं नका ! हे गाढव स्वराज्यवालेसुद्धा येतात !

**शास्त्रीबुवा** – म्हणजे टिळकांकडले –

**रावसाहेब** – तर काय ! लेकाचे खुळचटासारखं कांही तरी करतात –

**शास्त्रीबुवा** – अन् मग आपले पाय धरायला येत असतील – ( संभ्या येतो )

**रावसाहेब** – काय रे ?

**संभ्या** – त्ये आपलऽ रामलाल जीवनजी –

**रावसाहेब** – आत्ता ह्या वेळीं काय आहे त्याचं काम !

**संभ्या** – लअी गयावया करीत्यात –

**रावसाहेब** – असं असं ! बराय् म्हणावं. उद्या कोर्टांत ये, मग पाहूं – ( संभ्या जाऊं लागतो ) अे, हें बघ, म्हशीची सरकी पेंड सरली आहे म्हणावं – ( पुन्हा संभ्या जाऊं लागतो ) अन् संभ्या, त्याला म्हणावं, तुपाचा डबा पाठवलास, त्याला घाण येत होती ! ( संभ्या जातो )

**शास्त्रीबुवा** – कुणी व्यापारी असेल –

**रावसाहेब** – शेण खातात लेकाचे ? मग येतात पाय चाटायला ! या गाढवानं म्हणे त्या मुंबअीच्या पेढीला पन्नास हजाराला गंडा घातला !

**शास्त्रीबुवा** – ( डोळे फिरवीत ) पन्नास हजार !

**रावसाहेब** – डोळे फिरवतांय् काय असे !

**शास्त्रीबुवा** – नाही म्हणजे थोडे अधिकच पैसे खाल्लेन् !

**रावसाहेब** – मग आला पाया पडायला ? रडला काय, गागला काय !

**शास्त्रीबुवा** – म्हणजे लाथ मारून मग नमस्कार ! पण काम झालं ना त्याचं !

**रावसाहेब** – त्याचं असं आहे शास्त्रीबुवा, अेकदा शब्द दिला की दिला ! मग तो आम्हांला फिरवतां येत नाही –

**शास्त्रीबुवा** – काय धर्मबुद्धि आहे ! तरी गाढवानं वाशेळ तूपच धाडलंन् !

**रावसाहेब** – अहो गरज सरो अन् वैद्य मरो ! काय समजलेत ?

**शास्त्रीबुवा** – समजलों खरं – पण तें मघाचं कोल्हापूर प्रकरण –

**रावसाहेब** – तर काय ! मी म्हणतों, त्या बर्व्यांनी महाराजाचा वाटेल तितका छळ केला ! वेडा होता म्हणून केला ! त्यांत या टिळकाला मधे पडून काय करायचं होतं ! शेवटी झालीच ना फिर्याद ? डोंगरीची हवा खावी लागलीच ना ? अूठ रे सुळा अन् बस रे खांद्यावर ! कुणी सांगितलं होतं अेवढं ?

**शास्त्रीबुवा** – तर काय ! कीलोत्पाटीव वानरः !

**रावसाहेब** – ( बारीक आवाजांत ) अहो, ब्राह्मण मंडळीविषयी साहेबांचं मत किती घाणेरडं झालंय् यामुळं !

**शास्त्रीबुवा** – ( घाबरून ) खरं की काय !

**रावसाहेब** – त्यांतल्या त्यांत कोकणस्थ ब्राह्मणांविषयी –

**शास्त्रीबुवा** – म्हंजे आश्वलायनांविषयीच ना ? हिरण्यकेशीयांविषयी नव्हे ना ?

**रावसाहेब** – म्हणजे तुम्ही –

**शास्त्रीबुवा** – मी हिरण्यकेशी ! साहेबाला जाअून सांगतों हवं तर ! बाबा रे, मीं आपला गरीब हिरण्यकेशी वैदिक आहे ! मी कांही टिळक-

सारखा आश्वलायन नव्हे ! पाहिजे तर तुझं हव्यकव्य, श्रावणी, हे सगळ दक्षिणा न घेतां – अगदी तुझ्या खारीक-सुपारीलाहि हात न लावतां करीत जाअीन ! पण माझ्याविषयी तुझं चांगलं मत असू दे !

**रावसाहेब** – ( तुच्छतेने ) शास्त्रीबुवा, अगदी बैल आहांत तुम्ही !

**शास्त्रीबुवा** – बैल !

**रावसाहेब** – अहो साहेब श्रावणी अन् हव्यकव्य करीत नाही ! अन् दुसरं तुमच्याविषयी साहेबाचं मत म्हणतां – तर खिजगणतीत तरी आहांत का तुम्ही साहेबांच्या !

**शास्त्रीबुवा** – नाही ना ?

**रावसाहेब** – नांव कशाला घेतां !

**शास्त्रीबुवा** – अगदी नक्की नाही ना !

**रावसाहेब** – छे !

**शास्त्रीबुवा** – मग बरं आहे – !

**रावसाहेब** – अहो त्यांचं मत वाअीट झालंय्, ते टिळक, आम्ही, अशांविषयी –

**शास्त्रीबुवा** – असं का !

**रावसाहेब** – आता हे प्लेग-प्रकरणच पाहा की ! अहो, रॅण्डसाहेब फार चांगला माणूस बरं का !

**शास्त्रीबुवा** – असं ना !

**रावसाहेब** – गाठ पडली, तेव्हा मला म्हणाला होता, व्हेरी ग्लॅड टु सी यू !

**शास्त्रीबुवा** – गलंडाविषयी कांही सांगत होता वाटतं ! घामगलंडाविषयी –

**रावसाहेब** – कशाविषयी ?

**शास्त्रीबुवा** – म्हणजे हेच आपलं –' हो ! गोऱ्या लोकांनाहि गलंड, गळवं होतच असतील की !

**रावसाहेब** – ( कीव करून ) शास्त्रीबुवा, तुम्हीं लोकांनी अेक हजार वर्षं अिंग्रजांच्या तालमींत राहून अे बी सी डी गिरवलं पाहिजे ! तेव्हा कुठं तुमच्या डोळ्यांत अुजेड पडेल पडला तर !

**शास्त्रीबुवा** – अितकं कठीण आहे का ते !

**रावसाहेब** – मूर्ख कुठले !

**शास्त्रीबुवा** – आपण त्या कुण्या साहेबाविषयीं कांही तरी सांगत होतांत –

**रावसाहेब** – अहो त्याचा खून पाडला या लोकांनी !

**शास्त्रीबुवा** – बाप रे !

**रावसाहेब** – अगदी गोळया घालून मारला ! बहकलेली कार्टी ! अन् या सगळयांचं मूळ आहे तो भांडखोर टिळक !

**शास्त्रीबुवा** – असं ना !

**रावसाहेब** – शेवटी पुनः जेलमध्ये जाव लागलं !

**शास्त्रीबुवा** – लागणारच ! यथा रोगस्तथौषधम् !

**रावसाहेब** – अन् आता म्हणे दारू पिअू नका ! पिकेटिंग करताहेत म्हणे दुकानावर –

**शास्त्रीबुवा** बरोबरच आहे –

**रावसाहेब** – ( खेकसून ) काय !

**शास्त्रीबुवा** – नाही – आपण म्हणतां ते –

**रावसाहेब** – मग बरं आहे – कां रे बाबांनो पिअू नका ! पिणारे कुणाच्या खिशावर डाका घालून पितात की काय !

**शास्त्रीबुवा** – पाहा तर खर !

**रावसाहेब** – अन स्वतःचं हिताहित ज्याला त्याला कळतंच की ! साहेब अवढाली दारू पितात-ब्रँडी-व्हिस्की-रम-बीर शांपेन –

**शास्त्रीबुवा** – काय ज्ञान आहे –

**रावसाहेब** – त्यांचा नाही कुठ घात झाला तो ! मूर्ख लेकाचे !

**शास्त्रीबुवा** – तर काय ! अन् सुरा प्यावी, अस शास्त्रांमध्ये सुद्धा सांगितलं आहे !

**रावसाहेब** – आहे ना ! काय काय सांगितलय् !

**शास्त्रीबुवा** – सौत्रामण्यां सुरां पिबेत् – सौत्रामणी यज्ञांत सुरा घ्यावी – कृष्णसुद्धा दारू पीत होता – महाभारतांत सांगितलंय –

**रावसाहेब** – ( कांही तरी कल्पना येअून ) शास्त्रीबुवा, हें सभेंत सांगाल कां ?

**शास्त्रीबुवा** – कुठे ?

**रावसाहेब** – सभेंत ? परवा वाचनमंदिरांत दारूच्या समर्थकांची सभा आहे –

**शास्त्रीबुवा** – नाही म्हणजे –

**रावसाहेब** – आंता काय नाही म्हणजे ?

**शास्त्रीबुवा** – नाही-तशी कांही हरकत नाही –

**रावसाहेब** – झकास सभा करूं ! मुख्य भाषण ठेवूं तुमचं. दारू पिणं हें शास्त्रविहित कसं आहे, वैदिकऋषीहि कसे दारू पीत होते – दारू आरोग्याच्या दृष्टीनंहि कशी चांगली असते प्यायला – अुत्तेजक-किंचितशी मादक – तरतरी आणणारी – असं छानदार चौफेर भाषण होअूं द्या. तुम्ही – प्यायलां आहांत की नाही कधी ?

**शास्त्रीबुवा** – छे छे !

**रावसाहेब** – कांही हरकत नाही – आज तुम्हांला संथा देअूं – ( बाअीसाहेब आंतून येतात. )

**बाअीसाहेब** – कसली संथा ?

**रावसाहेब** – नव्हे हो ! ती ही आपली – त्रिसुपर्णाची ! शास्त्रीबुवा शिकवणार आहेत. घेअूंच्या ऐवजी देअूं म्हटलं अेवढंच !

**बाअीसाहेब** – चंद्रोदय झालाय् – सैंपाक्याला घरीं जायला अुशीर होतो मग.

**रावसाहेब** – येतोंच की ! शास्त्रीबुवा, तुम्ही आंत येतां की –

**शास्त्रीबुवा** – बसतों वहिनीसाहेबांशीं बोलत –

**रावसाहेब** – ठीक आहे. ( जातात )

**बाअीसाहेब** – शास्त्रीबुवा, सोमवारांचं फल काय हो ?

**शास्त्रीबुवा** – सोळा सोमवारांचं ? हेच की आपलं ! सकलारिष्टशान्त्यर्थं – सकलाभीष्टप्राप्त्यर्थं-

**बाअीसाहेब** – म्हंजे मनांतलं सगळं पुरं होतं का ?

**शास्त्रीबुवा** – वा ! झालंच पाहिजे –

**बाअीसाहेब** – तर मग करूं का सुरू ?

**शास्त्रीबुवा** – अगदी खुशाल ! पण – मनांतल्याचा जर सुगावा लागूं शकला, तर अेखादा दानाबिनाचा तोडगा आणखी सुचवतां येअील !

**बाअीसाहेब** – आता तुमच्यासारख्या वडील माणसाजवळ सांगायला कसली लाज ! अहो, हे किनअी –

**शास्त्रीबुवा** – काय ?

**बाअीसाहेब** – मेलं सांगायलाहि कसंसंच वाटतं !

**शास्त्रीबुवा** – म्हणजे कांही दुसरी भानगड नाही ना ?

**बाअीसाहेब** – भानगड नाही – घरचंच आहे – हिकडून –

**शास्त्रीबुवा** – कुणीकडून ?

**बाअीसाहेब** – हिकडून अलीकडे – अलीकडे प्यायचं होतं !

**शास्त्रीबुवा** – म्हणजे –

**बाअीसाहेब** – दारू का वारू काय म्हणतात ती !

**शास्त्रीबुवा** – बऽरं ! आणखी ?

**बाअीसाहेब** – मेलं हें तोंड घेअून कुठं तरी जावंसं वाटतं –

**शास्त्रीबुवा** – छे छे ! वहिनीसाहेब, असलं कांही करूं नका !

**बाअीसाहेब** – नाही तर काय ! जे काय अेकेक चाळे चालतात –

**शास्त्रीबुवा** – चाळे ?

**बाअीसाहेब** – संभ्या सांगत होता, बाहेर फिरतीवर गेले म्हंजे बाया नाचवतात – !

**शास्त्रीबुवा** – संभ्या ? तो अजागळ ?

**बाअीसाहेब** – अजागळ कशानी ? चांगला शहाणा आहे ! ( संभ्या रावसाहेबांची फाअील घेअून येतो. ) संभ्या, अिकडे ये बघूं !

**संभ्या** – ( अर्दलीसारखा वाकून, हात बांधूनअुभा राहतो ) येस बाअीसाब !

**बाअीसाहेब** – मेल्या हे रे काय ! खूळ तर नाही ना लागलं ?

**संभ्या** – नो बाअीसाहेब !

**शास्त्रीबुवा** – ( गदगदा हसत ) वहिनीसाहेब, मघा रावसाहेबांनी

सांगितलं तें अमलांत आणतोय् तो! ए नंदिकेश्वरा, रावसाहेबांनी हांक मारली म्हणजे अर्दलीसारख वागायचं! बाओसाहेबांच्या समोर नव्हे –

**बाओसाहेब** – मेल्या! अे संभ्या, हिकडे बघ, मघा मला काय सांगत होतास?

**संभ्या** – ( बावरून ) कवा? कुटं? काय?

**बाओसाहेब** – पहा! आता प्रपादनो आहे! अरे मघां नव्हतास का सांगत!

**संभ्या** – मपल्या सैपाकाचं व्हय्! आस आस! व्हय् व्हय्! मला काअी तुमच्यावानी सैपाक करतां येत न्हाअी – आपला मराठ्याचा सैपांक – म्हंजी ह्येच – कुटं झुनका, कुटं झुनझुनं, कुटं कोरड्यास –

**बाओसाहेब** – नव्हे रे –

**संभ्या** – न्हाअी म्हंजी भाकरीबी करीतो मपला मी. तुमच्या भाकरी पातळ कागदावानी आसऽल्यात – आमची येक भाकर खाल्ली का, त पोट बाजरीच्या पोत्यावानी ताठ होतंय –

**बाईसाहेब** – पहा! इकडल्या तिकडल्या गोष्टी सागून कसा वेळ मारून नेतोय् ती! अरे मघा तें हे नव्हतास का सांगत?

**संभ्या** – काय?

**बाईसाहेब** – गाण्याचं?

**संभ्या** – छा छा! मला कुटं येतय् गान! अुगा आपला येकादा आबंग, कुटं गवळन, कुटं आपल्या भारूडांतलं कायबाय –

**बाईसाहेब** – तुझं नाही विचारीत मी!

**संभ्या** – मंग?

**बाईसाहेब** – हे अैकतात त्या बाईच्या गाण्याचं –

**संभ्या** – कुटं? कवा? काय?

**बाईसाहेब** – मघा नव्हतास सांगत? कायससं प्यायल्यावर हे बाईला बोलावून नाचायला लावतात – ( आंतून रावसाहेब ढेकरा देत येतात ),

**रावसाहेब** – काय रे संभ्या, काय चालली आहे चर्चा?

**संभ्या** – ( बावचळून ) काय न्याय् – ह्ये आपल त्यें ह्ये – का म्हंल्यात त्ये –

**रावसाहेब** – खून केलेल्या आरोपीसारखा चाचरला आहेस काय असा ! नीट सांग की –

**संभ्या** – कुठं काय न्हाय् – त्ये आपल्या नाचाचं –

**रावसाहेब** – नाचाचं ?

**शास्त्रीबुवा** ( घाईघाईनं ) – म्हणजे – शिवतांडवाचं ! आज वहिनीसाहेब कीर्तनाला गेल्या होत्या ना, तिथं आख्यान होतं नटराजाच ! तर त्यावर चर्चा चालली होती –

**रावसाहेब** – असं असं ! शास्त्रीबुवा, शंकर-पार्वती नाचली होती, ते ही बायका-मंडळी मिटक्या मारीत ऐकतात ! अन् कुठं एखादी बाई नाचायला लागली, तर यांचा कपाळशूळ उठतो ! ( संभ्या आंत निसटतो. )

**बाईसाहेब** – हे आपलं कांही तरीच हो !

**रावसाहेब** – कांही तरीच ? का हो ! आता हेच पहा की ! शास्त्रीबुवाच सांगत होते, की दारू प्यावी असं शास्त्रांत सुद्धा सांगितल आहे – आहे ना हो शास्त्रीबुवा ?

**शास्त्रीबुवा** – हो म्हणजे –

**बाईसाहेब** – हाय शास्त्रीबुवा ?

**शास्त्रीबुवा** – अहो म्हणजे ते –

**रावसाहेब** – त्यांनी मघा कसलासा शास्त्रार्थ सुद्धा सांगितला ! आम्ही त्यांचं व्याख्यान ठरवलंय दोन दिवसांनी –

**शास्त्रीबुवा** – पण रावसाहेब –

**रावसाहेब** – आता पण नाही नी परंतु नाही !

**शास्त्रीबुवा** – त्या दिवशी मला श्राद्धीं जेवायला जायचं आहे – किती उशीर होईल ते सांगतां यायचं नाही –

**रावसाहेब** – सरलांत ना मागं ? सरायचेच तुम्ही ! नाही तर आम्ही पहा ! एकदा एक गोष्ट ठरली की ठरली ! कारण आहे त्याचं ! माहीत आहे का काय तें ?

**शास्त्रीबुवा** – नाही –

**रावसाहेब** – अहो आम्ही रोज झोपतांना थोडं औषध घेत असतो !

**बाईसाहेब** – ( आपल्याशींच ) जळलं लक्षण तें –

**रावसाहेब** – काळजी करूं नका शास्त्रीबुवा! आज आम्ही तुम्हांलाहि घोटभर देऊं – थोडी कडक असते, पण घ्यावी अन् पडून रहावं! कसं छाऽन वाटतं! ( बाअीसाहेब फणकऱ्याने जाअूं लागतात ) कां हो? निघालांतशा? •

**बाअीसाहेब** – दृष्टिआड सृष्टि! कांही का करा ना!

**रावसाहेब** – अहो रागावूं नका अशा! तसं पाहिलं तर आम्ही स्त्रियांची कदर करणारे सुधारक आहोत – कांही अजिबातच सनातनी नाही – त्या बाळ गंगाधरासारखे –

**बाअीसाहेब** – कशाला नांव घ्यायचं तें?

**रावसाहेब** – कां? तुम्हांला नाही अैकवत वाटतं ते नांव आमच्या तोंडून निघालेलं? बरं का शास्त्रीबुवा, आमच्या घरी त्या स्वराजिष्टांची मोठी भक्ति! टिळकाला शिक्षा झाली, त्या दिवशीं या जेवल्यासुद्धा नाहीत –

**शास्त्रीबुवा** – छान छान! नाही तरी वहिनीसाहेबांची पहिल्यापासूनच चांगल्यावर भक्ति –( जीभ चावून ) म्हणजे आपल्यावरसुद्धा –

**रावसाहेब** – ( हसून ) शास्त्रीबुवा, या बोटावरची थुंकी त्या बोटावर करण्यांत तुम्ही फार पटाअीत आहांत –

**शास्त्रीबुवा** – आमचं कसलं आलंय्! आपलं चार तुम्हा शहाण्यासुरत्यांच्या घरीं येअून जाअून –( संभ्या येतो. )

**संभ्या** –( अडखळत, संकोचाने )रावसाब–

**रावसाहेब** – काय रे?

**संभ्या** – न्हाअी पर – लअी टैम झाला –

**रावसाहेब** – मग?

**संभ्या** – 'आपलं त्ये – औशीद –

**रावसाहेब** – लाजूं नकोस असा! आण आण!

**संभ्या** – न्हाअी पर –

**रावसाहेब** – आता काय पर?

**संभ्या** – न्हाअी – शास्तरीबावा –

**रावसाहेब** – अरे वेड्या, आज शास्त्रीबुवांनाच तर नैवेद्य दाखवायचाय् ( संभ्या आंत जातो ) काय शास्त्रीबुवा, मग करणार ना प्रारंभ!

**शास्त्रीबुवा** – नाही – आज मला अतिशय पडसं झालं आहे – ( शिंकतो )

**रावसाहेब** – मग पडशावर तर औषध फार अुत्तम ! चांगलं छान गरम असतं तें –

**शास्त्रीबुवा** – शिवाय अुष्णता अतिशय भडकली आहे – नुसती लाही होत्येय् अंगाची –

**रावसाहेब** – ( बाअीसाहेबांकडे पाहून हसत ) पाहिलत ? आम्ही भटा-भिक्षुकांची निंदा करतों ती कांही व्यर्थच नाही ! अुगीच का साहेब राज्य करतो आहे आमच्यावर ? क्षणांत असं, क्षणांत तसं – ( संभ्या आंतून ब्रँडीची बाटली, ग्लास घेअून येतो. तोच बाहेरून हांका येतात – " अहो रावसाहेब ! " संभ्या बाटली रावसाहेबांसमोर ठेवतो. )

**रावसाहेब** – संभ्या, बघ रे बाहेर कोण कोकलतंय् तें ? भलत्या वेळीं येतात लेकाचे ! कॉमनसेन्स नाही !

( संभ्या बाहेर जातो. बाहेर पुढील बोलणें होते. " कोन हाये ? " "मी आहे –" " न्हव, पर काम काय हाये ? " " अत्यंत महत्त्वाचं काम आहे म्हणावं रावसाहेबांना " " पर त्ये भ्येटायचे न्हाअीत या येळीं ! " " नाही कसे बाबा ? अतिशय जरुरीचं काम आहे – चल, मीच येतो आंत ! " संभ्या अडवीत असतां त्याला अव्हेरून भास्करराव आंत येतात. त्यांना पहातांच रावसाहेब बाटली व ग्लास लपवतात. )

**भास्करराव** – हे आहेतच की अिथं ! नमस्कार रावसाहेब ! आपला माझा परिचय नाही – मी न्यू अिंग्लिश स्कूलमध्ये मास्तर आहें – नांव कांही महत्त्वाचं नाही माझं – मी आपल्याला अतिशय महत्त्वाच्या कामासाठी त्रास द्यायला आलों आहें – आपण आमचेच आहांत –

**रावसाहेब** – ( संतापून ) चऱ्हाट वळीत बसूं नका ! काय तें पटकन् सांगून टाका – अन् अगोदर माझा ऑर्डर्ली नको म्हणत असतां कां आलांत घरांत ?

**भास्करराव** – रागावूं नका रावसाहेब ! काम अतिशय महत्त्वाचं आहे –

**रावसाहेब** – डॅम् अिट् ! पुनः तेंच !

**भास्करराव** – आपण या वेळीं काय वाटेल तें म्हणालांत तरी मी

अैकून घेअीन – पण आज अेका आरोपीला पोलिसांनी अटक केली आहे – त्याची आअी अत्यवस्थ आहे – तेव्हा त्याला जामिनावर सोडावयाची तेवढी खटपट आपण करावी –

**रावसाहेब** – पोलीस विनाकारण कुणाला पकडीत नाहीत – या आरोपीनं शेण खाल्लंन् कशाला ?

**भास्करराव** – त्यानं शेण खाल्लं नाही –

**रावसाहेब** – कुठं डाका घातला असेल –

**भास्करराव** – नव्हे –

**रावसाहेब** – कुणा अेकीचा हात धरला असेल –

**भास्करराव** – तेंहि नव्हे –

**रावसाहेब** – मग काय सोट्या म्हसोबाला नमस्कार केलान म्हणून पकडलं त्याला ?

**भास्करराव** – होय – त्याच जातीचं –

**रावसाहेब** – त्याच जातीचं काय ?

**भास्करराव** – रावसाहेब, त्याला दारूच्या गुत्त्यावर पिकेटिंग करतांना पकडलं आहे – तो हात जोडून सांगत होता, दारू पिअू नका म्हणून ! तर त्याला धक्काबुकी करून पोलिसांनी अटक केली आहे –

**रावसाहेब** – ( भडकून ) याला हा भिंतीला तुंबड्या लावायचा अुद्योग कुणी सांगितला होता ?

**भास्करराव** – ( आश्चर्याने ) तुबड्या !

**रावसाहेब** – तुम्हां फाजील लोकांना वर्षवर्ष तुरुंगांत खडी फोडायला धाडलं पाहिजे – घरचे अुद्योग सोडून तुम्हांला या खरजेच्या खपल्या काढायला कुणीं सांगितलं ?

**भास्करराव** – अहो पण रावसाहेब –

**रावसाहेब** – तुम्ही फार शहाणपणा करायला लागलां अहांत ? आम्हांला ठाअूक आहे तुम्हांला त्या टिळकाची फूस आहे – घातकी माणूस – राजकारण करतो म्हणे –

**भास्करराव** – रावसाहेब, आपण बोलणं थांबवूं या हे ! प्रश्न अेवढाच आहे – आपण त्या बिचाऱ्याच्या आअीला त्याची भेट घडवणार आहांत का ?

**रावसाहेब** – चालते व्हा – मी कांहीहि करणार नाही –

**भास्करराव** – ( बाओींकडे वळून ) वहिनीसाहेब, आपण स्त्री आहांत – आपल्याला स्त्रीचं मन कळूं शकतं – आपण तरी रावसाहेबांना –

**रावसाहेब** – शट अप् ! माझ्या घरांत बुद्धिभेद ?

**भास्करराव** – बुद्धिभेद नव्हे रावसाहेब ! आपण अुगीचच संतापला आहांत –

**रावसाहेब** – संतापलों आहें ? तुम्ही कोण बोलणार ? काय वाटेल तें करीन मी ! दारूसुद्धा पिअीन ! ( बाटली समोर काढतात ) माझ्या घरांत मी मालक आहें –

**भास्करराव** – ( चकित होअून ) मग प्रश्नच मिटला !

**रावसाहेब** – नव्हे सुरू झाला ! त्या बदमाषाला वर्षाची शिक्षा द्यायला लावतों – अन् तुमच्यावर फिर्याद ठोकतो – धाडतों चार महिने – त्या टिळकालाहि चार-सहा वर्षं –

**भास्करराव** – रावसाहेब –

**रावसाहेब** – स्कौण्ड्रल् ! ट्रेसपास करून घरांत शिरतो रात्रीचा ! गेट आअुट !

**भास्करराव** – रावसाहेब –

**रावसाहेब** – गेट आअुट ! संभ्या ! ( भास्करराव बाहेर जातात. ) डांबीस ! माझ्या घरांत शिरून मला शहाणपणा शिकवतो – ( बाटली अुघडीत ) रास्कल ! यांच्या गुरूला चार-सहा वर्षं खडी फोडायला पाठवलं पाहिजे –

**शास्त्रीबुवा** – म्हणजे –

**रावसाहेब** – त्या टिळकाला ! ही सगळी आग त्यानं लावली आहे ! ( ग्लास भरीत ) या सगळ्या असंतोषाचं कारण तो डांबीस माणूस आहे – कळीचा नारद – त्याचं नाक ठेचलं पाहिजे –

**बाओीसाहेब** – काय हे ?

**रावसाहेब** – ( त्यांच्याकडे पाहत ) कां ? तुमचं कां डोचकं अुठलं ? चला ! चालत्या व्हा !

**बाओीसाहेब** – जात्यें मी – माझ्यामागं काय हवं ते करावं –

**रावसाहेब** – हवं तें करतों – या शास्त्रीबुवालां पाजतों दारू – संभ्या, धर त्या शास्त्र्याचं मुंडक –

( संभ्या बावचळतो – शास्त्रीबुवा घाबरून अुठतो – रावसाहेब ग्लास अुचलून तोंडाला लावतात. पडदा. )

## प्रवेश दुसरा

[ लोकमान्यांच्या घराची पडवी – भास्करराव घाअीने येतो. ]

**भास्करराव** – दादा ! अहो दादा ! कुणी आहे का घरांत ? ( हाक येत नाही. ) आता काय करावं ? कुणी दिसत नाही ! ( थोडें थांबून ) दादा ! ( आंतून हाक येते – " कोण आहे ? " )मी – भास्कर –( नुकताच झोपेंतून अुठल्यासारखा अंग खाजवीत वामन येतो. वय सुमारे तीस ).

**वामनराव** – काय रे भास्कर ?

**भास्करराव** – वामन, दादा कुठं गेले ?

**वामनराव** – भले ! ते घरी भेटणार होय ? पहाटेसच स्नान-सध्या अुरकली, केसरीच्या अग्रलेखाचीं प्रुफें तपासलीं, अन् मग तो रेवरंड मॅकनिकल आला, त्याला घेअून गेले की पिकेटिंग दाखवायला !

**भास्करराव** – अन् मंडळी ?

**वामनराव** – बाकी सगळी केळकरांकडे गेली आहेत – आज त्रुलीला निमंत्रण !

**भास्करराव** – तूं आत्ताशी अुठतो आहेस वाटतं ?

**वामनराव** – अरे, तूं गेलास जामिनाची खटपट करायला, अन् मीं रात्रभर म्हातारीजवळ जागत बसलों होतों ! पहांटेस विनायक आला, तेव्हा अुठून आलों, अन् अुगीचच अंग टाकलं, तर ही वेळ झाली !

**भास्करराव** – बरं आहे ना आता ?

**वामनराव** – होतं तसंच आहे. सारखा धसका घेतला आहेन म्हातारीनं – म्हणे, आमच्या सबंध कुळींत कुणी जेलमध्ये गेलं नाही : सारखा तो जप चालला आहे !

**भास्करराव** – ( निःश्वास सोडून ) अन् आमचीं कुळं काय दरवडे घालणारांचीं आहेत ? प्रत्येक कर्ता पुरुष काय जेलमध्ये वर्ष-वर्ष गिट्टी फोडून आला आहे आमच्या घरीं ?

**वामनराव** – तूं भारी हळवा आहेस भास्कर !

**भास्करराव** – हळवा ?

**वामनराव** – नाही तर काय ?

**भास्करराव** – सांग रे बाबा कसा तो ?

**वामनराव** – अरे, जुन्या कल्पना अुरांशीं बाळंगून गेली पिढी जगली. त्या ढासळतांना त्या पिढीला पाहवत नाहीत. त्यामुळं बसतात झालं दुःख अुगाळीत !

**भास्करराव** – पण मुलगा आपला देशासाठी गेला जेलमध्ये – अेवढंहि कळूं नये ?

**वामनराव** – न कळलं तर न कळलं ! तेवढं समजावीत बसण्यापुरताहि वेळ कुठं आहे आपल्याजवळ ! माझं बघ ! मी थोडा वेळ म्हातारीचं अैकून घेतलं. मग तिला सांगितलं, डॉक्टरनं सांगितलंय्, अधिक बोललांत तर वात होअील म्हणून. वाताचं नांव काढल्याबरोबर म्हातारीच्या तोंडाला खीळ बसली –

**भास्करराव** – असंच दुहेरी युद्ध करावं लागणार आहे पुढच्या पिढीला !

**वामनराव** – दुहेरी ?

**भास्करराव** – नव्हे तर काय ! घरांत घरच्यांशीं वाद घालायचा अन् बाहेर सरकाराशीं झुंजायचं !

**वामनराव** – बरं हें बघ, तें तत्त्वज्ञान नंतर चर्चीत बसूं ! अगोदर रात्रींचं काय झालं तें सांग !

**भास्करराव** – व्हायचं तें झालं !

**वामनराव** – तें कळलंच ! ज्या अर्थी तो रात्रीं सुटून आला नाही, त्या अर्थी तुझं काम झालं नसावं, हें आम्हीं ताडलंच. पण काय काय झालं ?

**भास्करराव** – तें दादा आल्यावर अेकदमच सांगेन. पण लवाट्यांची सभा कशी पार पडली ?

**वामनराव** – झकास ! मॅजिक लॅंटर्न होता, त्यामुळं व्याख्यान अतिशय परिणामकारी झालं. कितीकांनी भडाभड तिथल्या तिथं शपथा घेतल्या दारू सोडल्याच्या –

**भास्करराव** – अन् गणेश पेठेंत ?

**वामनराव** – तिथं मात्र थोडी अधिक खळबळ झाली. अँडरसन आला होता –

**भास्करराव** – असिस्टंट कलेक्टर ? तो कशाला तडमडला तिथं ?

**वामनराव** – वा ! त्याला तर गुत्तेवाल्यांचा भारी पुळका !

**भास्करराव** – खळबळ म्हणजे काय काय झाली ?

**वामनराव** – अरे, आपले वासूअण्णा भावे अन वामनराव देशपांडे हे दोघे होते पिकेटिंग करीत. अँडरसन आला, अन् धक्काबुक्की करायला लागला. हे दोघे भडकले !

**भास्करराव** – ( अुत्सुकतेने ) काय म्हणाले ?

**वामनराव** – तो लोकांना 'जंगली' म्हणाला वासूअण्णांनी ताठपणं विचारलं, 'जंगली कुणाला म्हणतोस ? मी बाँबे युनिव्हर्सिटीचा ग्रॅज्युअेट आहें !'

**भास्करराव** – छान ! मग ?

**वामनराव** – मग काय ? बोलाचाली वाढली – शेवटीं त्यांना पकडलंन् गुलामानं ! हा अेवढा थोरला लोंढा त्यांच्या मागोमाग धावला !

**भास्करराव** – आता कुठं आहेत ते ? फरासखान्यांत ?

**वामनराव** – दिले म्हणे सोडून रात्रीं दहा वाजतां – जामीन घेअून ! जामिनाची खटपट दादांनीच केली.

**भास्करराव** – शाब्बास पठ्ठे ! असं झालं पाहिजे ! मग अिथं आले असतील ?

**वामनराव** – तर काय ! रात्रीं दोन वाजेपर्यंत अिथंहि मंडळी बसलीच होती !

**भास्करराव** – वामन, आपण दादांच्या तब्येतीशीं धसमुसळेपणानं वागतों खरे, पण मला बुवा सारखी धास्ती वाटत असते –

**वामनराव** – कसली ?

**भास्करराव** – त्यांना डायबिटिसचा विकार –

**वामनराव** – त्याचं असं आहे भास्कर, अरे तूं – मीं काळजी करून का कांही होणार आहे ? ज्यांनी काळजी करायची, ते तर हातीं जळता अग्नि घेअून लागले आहेत अिंग्रजांमागं !

**भास्करराव** – बरं, कलेक्टर कारमायकेलनं बोलावलं होतं भेटीला, त्याचं काय झालं ?

**वामनराव** – व्हायचं तें झालं !

**भास्करराव** – पण काय ?

**वामनराव** – अरे, काल परतले त्याच्या बंगल्यावरून तेव्हा नुसते तांबडेलाल झाले होते. तात्यासाहेब गेले होते बरोबर – ते सांगत होते, खूप झमकली दोघांची –

**भास्करराव** – अरेच्च्या ! पण झमकली म्हणजे काय काय ?

**वामनराव** – दुसरं काय ! तो मारे तोऱ्यानं बोलायला लागला. अगोदर म्हणे, सरकारनं नुसतीं दुकानं अुघडलीं आहेत. कुणाला हात धरून पाजीत तर नाही सरकार ?

**भास्करराव** – भले ! मग ?

**वामनराव** – दादा म्हणाले, आम्हीहि हात जोडून ‘ दारू पिअू नका ’ अशी विनवणी करीत असतों. तोहि गुन्हा नव्हे.

**भास्करराव** – अुघडच आहे !

**वामनराव** – कारमायकेल चिडला. तो म्हणाला, “ माअिण्ड मिस्टर टिलक, आय् वोण्ट अलाअु यू टु रूल ओव्हर पूना ! ”

**भास्करराव** – असं का ? दादा काय म्हणाले ?

**वामनराव** – ते म्हणाले, “ माअिण्ड मिस्टर कारमायकेल, यू काण्ट चेक पीपल टु रूल देमसेल्व्ह्ज् ! ”

**भास्करराव** – आश्शी ! खूप जिरली लेकाची ! मग ?

**वामनराव** – खूप बाचाबाची झाली – अरे ! दादा आलेच की !

( पगडी, अुपरणें, काठी – अशा वेशांत लोकमान्य बाहेरून परत येतात. मुद्रा संतापलेली आहे. येतांच भास्कररावांना पाहून ते थांबतात. )

**लोकमान्य** – ( अुग्रपणें ) काय झालं भास्कर ?

**भास्करराव** – सगळंच तिरपागडं झालं ! जामिनावर सुटूं शकला नाही तो –

**लोकमान्य** – तूं शिरस्तेदाराकडे गेला होतास ना ?

**भास्करराव** – हो–पण तो भला माणूस बाटली अुघडूनच बसला होता –

**लोकमान्य** – ( ओठ चावून ) असं हं ? काय म्हणाला ?

**भास्करराव** – त्याचा गडी येअूं देत नव्हता. मी त्याला बाजूला सारून आंत शिरलों. तर अेकदम भडकून मला म्हणे, कां आलास ? मीं कारण सांगितलं, तर म्हणे हा तुंबड्या लावायचा अुद्योग कुणीं सांगितला तुम्हांला ?

**लोकमान्य** – मग ?

**भास्करराव** – अन् म्हणे, वर्षवर्ष खडी फोडायला धाडलं पाहिजे तुम्हां लोकांना !

**लोकमान्य** – आस्सं ! आणखी ?

**भास्करराव** – तुम्हांलाहि नाही नाही तें बोलला – मी अुत्तर द्यायला गेलों, तर म्हणतो, गेट आअुट ! ट्रेसपास केलास ! मलाहि धाडतों म्हणे चार महिने – अन् स्कौण्ड्रलहि म्हणाला !

**लोकमान्य** – मग तूं काय केलंस ?

**भास्करराव** – मीं ? मीं कांही नाही केलं ! परत आलों !

**लोकमान्य** – ( अेकदम भडकून ) परत आलास ? नुसताच ? अरे त्याचा कान धरून फाडकन् श्रीमुखांत कां भडकावली नाहीस ? तुमचं रक्त अन्यायाच्या चिडीनं तापत कसं नाही ?

( भास्कर स्तब्ध होतो, वामनहि. लोकमान्य आंत जाअूं लागतात. जातां जातां मुद्रा विचाराने थोडी शांत होते. भास्कर जाअूं लागतो. लोकमान्य मागे फिरून त्याला हाक मारतात. )

**लोकमान्य** – भास्कर, निघालास कुठं ?

**भास्करराव** – मी –

**लोकमान्य** – जाअून असलं कांही करूं नकोस हो ! नाही तर म्हणशील टिळकांनी सांगितलं, म्हणून मीं केलं ! अरे बाबा, हें जातीचंच असावं लागतं ! ( थोडें थांबून ) तुम्ही तरी काय कराल ! सगळीकडे असंच आहे ! रावसाहेब काय अन् भाअूसाहेब काय ! आपलाच दाम खोटा ! कुऱ्हाडीचा दांडा, अन् गोतास काळ –

( विचारमग्न अवस्थेंत आंत जातात. पडदा पडतो. )

---

## महाराष्ट्र प्रकाशन – प्रकाशित पुस्तकें

(१) सुलभ राज्यशास्त्र

(२) राज्यशास्त्राचा विकास

(३) भिल्लवीर कालिंग

आगामी –

(१) जगन्नाथाचा रथ – गो. नी. दाण्डेकर

(२) दयाळ – यदुनाथ थत्ते

(३) खजिन्याचा शोध – भा. रा. भागवत

(४) मोरू आणि मैना – चिं. वि. जोशी

(५) रानझरा – दुर्गा भागवत

(६) ऐकलेल्या गोष्टी – भ. श्री. पंडित